राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाकडून मानवी-हक्कांच्या पायमल्ली प्रकरणी प्राप्त होणा-या संदर्भावर / नोटीशीवर / शिफारशीवर शिघ्रतेने कार्यवाही करुन आयोगास उत्तर पाठविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग.

परिपत्रक क्रमांक: एचआरसी १३९९/९/पोल-१४,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२, दिनांक :८ जुन, १९९९.

वाचा :- सहसचिव, भारत सरकार, गृह मंत्रालय, नवी दिल्ली यांचे मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई यांना पाठविलेले क्रमांक: १५०११/७५/९९/एचआर, दिनांक २० मे, १९९९ चे पत्र.

## प रि प त्र क

मानवी हक्कांच्या पायमल्ली संदर्भात आयोगाकडून राज्य सरकारे - केन्द्रशासीत प्रदेश यांना ज्या नोटीसा / शिफारशी / संदर्भ पाठविले जातात त्या नोटीस / शिफारशी / संदर्भाबाबत राज्य सरकारकडून आयोगाला शिघ्रतेने उत्तरे पाठविली जात नसल्यामुळे आयोगाला अशा प्रकरणात अंतिम निर्णय घेउन कार्यवाही पूर्ण करण्यास विलंब होत आहे असे राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या १९९७-९८ च्या वार्षिक अहवालात आयोगाने नमूद केले आहे.

तरी राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने पाठविलेल्या नोटीस / शिफारस / संदर्भाबाबत राज्य शासनाच्या वतीने आयोगास शिघ्रतेने उत्तरे पाठविली जातील याची दक्षता घ्यावी, अशी विनंती करण्यात येत आहे.

[ के. एस. सय्यद ]
सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

[ कृ. मा. प. ]

प्रति,

सर्व विभागाचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

अपर पोलीस महासंचालक ( मानवी हक्क कक्ष / प्रशिक्षण ), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

सर्व पोलीस अधीक्षक.

सर्व जिल्हाधिकारी.

सर्व पोलीस आयुक्त.

सर्व विभागीय आयुक्त.

.....